# सात धोबिणी आणि
# सात लाकूडतोडे



# सात धोबिणी
# आणि
# सात लाकूडतोडे

लेखक : जॉन योमन
रेखाचित्रं : क्वेंटिन ब्लॅक
मराठी अनुवाद : नीलांबरी



खूप खूप वर्षांपूर्वी सात धोबिणी एकत्र रहात होत्या.



याच्या कपड्यांच्या टोपल्या घेऊन दररोज त्या नदीकडे जायच्या.



त्या सगळ्यांची अगदी घट्ट मैत्री होती आणि त्यांची नावं होती – डोटी, लोटी, मॉली, डॉली, विनी, मिन्नी आणि अर्नेस्टाईन.

नदीपाशी गेल्यावर त्या कपडे पाण्यात बुचकळून काढायच्या. मग कपड्यांना साबण लावून दगडावर आपटून आपटून धुवायच्या.



मग कपड्यांमधला साबण पाण्यानं काढून कपडे पिळायच्या. ते कपडे मग झाडांवर किंवा दगडांवर वाळत घालायच्या.



भागातल्या त्या सर्वोत्कृष्ट धोबिणी होत्या. पण तरी त्या आनंदात मात्र
हत्या. त्यांच्या लाँड्रीचा मालक बाल्थाझर टाईट, हा एक स्वार्थी आणि धूर्त
णूस होता. या धोबिणींकडून तो रात्रंदिवस काम करुन घ्यायचा.





दररोज त्यांना भल्या पहाटे उठावं लागायचं. कपडे धुवायला निघण्याआधी आ
दिवशी धुतलेल्या कपड्यांना इस्त्री करावी लागायची. तोपर्यंत त्या दिवशी धुवा
कपड्यांची गाठोडी बकर्‍यांनी ओढत आणलेल्या गाडीतून येऊन पडायची.
बकरी गाडीचा डिलिव्हरी बॉय होता बर्किन. तो म्हणायचा, “मला वाईट वाटतं
कालच्यापेक्षा आज जरा जास्तीच कपडे आणले आहेत.”


अशाच एका दिवशी मळलेल्या कपड्यांचा डोंगर
पाहून धोबिणी वैतागल्या. त्या दिवशी खरोखरच
खूप कपडे आले होते. त्या डोंगराकडे पाहून त्या
म्हणायला लागल्या..
घाणेरड्या चादरी
मळलेले रुमाल
वास मारणारे मोजे
खरकटं सांडलेले टेबल क्लॉथ्स
तेलाच्या डागांनी भरलेले कुडते
अस्वच्छ टॉवेल्स
तेव्हा अर्नेस्टाईन धोबिण म्हणाली, “आप
हे सगळं काम सोडून का देत नाही?”





हे ऐकून त्या सगळ्यांचे चेहरे क्षणार्धात उजळले.

"काय मस्त कल्पना आहे.." डॉली एक मळलेला कुडता खोलीतल्या व
फेकत म्हणाली.

"आपल्या डोक्यात ही कल्पना आधीच का नाही आली?" विनी म्हणाल

मग त्या सातजणी आनंदात नाचायलाच लागल्या.

तेवढ्यात दरवाजा उघडून  मिस्टर बाल्थाझर टाईट आत खोलीत आल

"महिलांनो", तो कुत्सित हसत म्हणाला, "चला, लव
कामाला लागा ..!"



मग मिस्टर टाईटला जमिनीवरचा धुवायच्या कपड्यांचा ढीग दिसला.
“कमालच आहे..” तो म्हणाला. हे आधीपेक्षा कितीतरी जास्त आहेत.
हे ऐकून मिन्नीला खूपच राग आला. ती जवळपास किंचाळलीच.. “मिस्टर
टाईट यांनाच हे काम करु द्या, मैत्रिणींनो...”



मग सात धोबिणींनी मिळून तो मळलेल्या कपड्यांचा डोंगर ढकलायला लागल्या.
टाईटच्या अंगावर तो डोंगर कोसळेपर्यंत त्या ढकलतच होत्या. त्या ढिगातून त्यांच
यायचा कसाबसा प्रयत्न करत होता तेव्हाच त्या सात धोबिणींनी लाँड्रीच्या बाहेर धू



त्या समोरच्या रिकाम्या बकरी-गाडीत बसल्या. डॉटनं गाडी चालवायला घेतली, आणि “लिसेंडर चल..” असं त्या बकरीवर ओरडली.

आपल्या सुटकेचा खूप आनंद झाल्यामुळे त्या धोबिणी बकरी-गाडी घेऊन शहराजवळच्या तलावातल्या दलदलीपाशी गेल्या. तिथे जाऊन त्यांनी जोरात चिखल उडवला आणि तिथून येणार्‍या जाणार्‍यांच्या कपड्यावर त्या चिखलाचे डाग पडले.









पण त्या सात धोबिणींना थांबवायची कोण
नव्हती.
मग त्या बाजारात जाऊन धडकल्या. तिथे
उलट्या केल्या. पिंजऱ्यातल्या प्राण्यांना
सोडलं.



का फळांच्या बागेपाशी थांबल्या. झाडांवर
ल्या शेतकर्‍यांच्या झाडांची फळं



या दुकानापाशी जाऊन सगळ्या हॅटस



त्या एका चर्चमध्ये घुसल्या आणि तिथल्या घंटेची दोरी जोरजोरात ओढली.
घंटेचा घणघणाट झाला. त्या महाप्रचंड आवाजानं रहिवासी घाबरुनच गेले.



करताना खूपच मजा येत होती. त्यांना हे थांबवायची
ा नव्हती. मग त्यांनी पुढचे कित्येक दिवस हाच
ठेवला. कपडे धुऊन, रगडून धोबिणींमध्ये चांगलीच
होती. त्यामुळे ज्या लोकांनी त्यांना थांबवायचा प्रयत्न
, हरुन गेले.





आता त्यांना सगळेजण घाबरायला लागले. प्रत्येक गावानं एक वॉच टॉवर (मनोर
केला. लोक त्या धोबिणींना येताना लांबूनच पहायचे आणि इतरांना सावध कराय
बघा, त्या रानटी धोबिणी येत आहेत..” असं लोक बकरी गाडी येताना पाहूनच अ
लागायचे.





ळच्याच जंगलातल्या एका झोपडीत सात लाकूडतोडे रहात होते. ते झाडं तोडून
खोडं नदीतून वाहून शहरात न्यायचे. सात धोबिणी येत आहेत असं त्यांनी ऐकलं
ते खळखळून हसले. “आम्ही पाहून घेऊ त्यांना.. आम्ही कोणालाच घाबरत
” असं ते प्रौढीनं म्हणाले. “त्या येतील तेव्हा त्यांना आपण बुचकळ्यात पाडू.”

मग त्या लाकूडतोड्यांनी जितकं भेसूर आणि भयानक दिसता येईल तितव
बनायचा निश्चय केला. त्यांनी केस विस्कटले, दाढी अस्ताव्यस्त केली.
चेहर्‌यावर आणि हातांवर काळं फासलं, चिखल फासला. मग घाबरवण
भेसूर आवाज कसे काढायचे ते शिकले.





ाच दिवसांमध्ये सात धोबिणी आपल्या बकरी-गाडीत बसून जंगलातल्या वरुन लाकूडतोड्यांच्या झोपडीपाशी आल्या. बकरी-गाडी झोपडीपाशी यावर त्यांना समोर एक भयंकर दृश्य दिसलं. लिसेंडर बकरी तर घाबरुन ्या जागी थांबली. रानटी धोबिणीदेखील तिथून घाबरुन पळ काढण्याच्या होत्या.

पण तेव्हा मिन्नीला जाणीव झाली की जे काही दृश्य तिनं पाहिलं होतं ते तिच्या आयुष्यातलं सगळ्यात गलिच्छ आणि गंभीर होतं. “चला बायांनो..” मिन्नी ओरडली. “तुम्ही उत्कृष्ट धोबिणी आहात हे विसरु नका.”



मग काय..! साती धोबिणींनी तिथून धूम ठोकली आणि लाकूडतोड्यांना पकडलं. त्यांना नदीत बुचकळून काढलं. भिजवून, रगडलं, आपटलं, पाण्यात खंगाळून काढलं आणि पिळून दगडांवर वाळत घातलं.

धोबिणींनी धुतल्यावर आणि रगडल्यावर लाकूडतोडे एकदम स्वच्छ झाले.
इतके सुंदर आणि स्वच्छ कधीच दिसले नव्हते. धोबिणींनी अव्वल दर्जाचं क
होतं. त्यांना आपल्या कामाचा अभिमान होता.

आता प्रथमच धोबिणींनी लाकूडतोड्यांना काळा रंग आणि चिखल यांच्या
होतं. धोबिणींना लाकूडतोड्यांचं हे खरं



धोबिणी परत मिस्टर बाल्थाझार टाईटकडे काम करायला गेल्याच नाहीत. त्यांनी लाकूडतोड्यांबरोबर लग्नं केली. लाकूडतोड्यांनी रहाण्यासाठी नवीन झोपड्या बांधल्या. त्यानंतर जेव्हा कधीही वाटसरू डोंगरातल्या रस्त्यांवरुन जायचे तेव्हा त्यांना लाकूडतोडे आणि धोबिणी आनंदानं जीवनक्रम आचरताना दिसायचे..

**समाप्त**